सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठी प्रधानमंत्री मातृ वंदना या योजनेच्या अंमलबजावणीसाठी दुसऱ्या हप्त्याचा सर्वसाधारण घटकाचा (General) राज्य हिश्याचा ४०% निधी वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय क्रमांकः प्रमावं-२०१९/प्र.क्र.२४६/कु.क.

गो. ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला, ए विंग,

मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई -४०० ००१.

तारीखः ११ ऑक्टोबर, २०१९

वाचा -

१) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे जा.क्र.राकुकका/PMMVY/न.क्र.७१/५७२५०-५८/१९, दि.१७.९.२०१९

२) केंद्र शासनाचे पत्र क्र.१५/१/२०१९-PMMVY Part-(४), दि.२६.०८.२०१९

प्रस्तावना :-

प्रधानमंत्री मातृ वंदना ही केंद्र पुरस्कृत योजना आहे.सदर योजना सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षापासून केंद्र व राज्य शासनाच्या सहभागातून (६०:४० यानुसार) राज्यात राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र शासनाचा ६० % व राज्य शासनाचा ४० % आर्थिक सहभाग आहे. सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाच्या दुसऱ्या तिमाहीसाठी सर्वसाधारण घटकासाठी संदर्भ क्र.२ च्या आदेशान्वये रु.२९,११,२१,८८६/- एवढा निधी केंद्र शासनाने राज्यास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे नावे उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये थेट जमा झाला आहे. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या अनुदानास अनुरुप असा राज्य हिश्याचा ४० % नुसार रक्कम रु.१९,४०,८१,२५७/- एवढा निधी प्रधानमंत्री मातृवंदना योजनेसाठी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात प्रधानमंत्री मातृवंदना योजनाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाने चालू आर्थिक वर्षास सर्वसाधारण घटकासाठी उपलब्ध करुन दिलेल्या ६०% निधीस अनुरुप असा राज्य हिश्याचा ४०% नुसार रु.१९,४०,८१,२५७/- ( रुपये एकोणीस कोटी

चाळीस लक्ष एक्याऐंशी हजार दोनशे सत्तावन्न फक्त) एवढे अनुदान वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाचे देयक कोषागारात सादर करुन राज्य हिश्श्यापोटी आवश्यक असलेला ४० % एवढा निधी प्राप्त करुन घेऊन आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या नावे उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये जमा करण्याची कार्यवाही करावी. यासाठी सहसंचालक (अर्थ व प्रशासन ) आरोग्य सेवा, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.७.२०१९ सोबतच्या परिशिष्ठामधील अटी व शर्तींची पूर्तता केलेली आहे. तसेच या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये जमा झाल्यानंतर लाभपात्र लाभार्थ्यांच्या खात्यात थेट जमा करण्यात येणार आहे असे प्रमाणित करण्यात यावे.

४. सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात "मागणी क्र. आर-१, २२११- कुटुंब कल्याण, (००) १०३ माता व बाल आरोग्य, (०२) प्रधानमंत्री सुरक्षित मातृत्व सहयोग कार्यक्रम, (०२) (०१) प्रधानमंत्री मातृ वंदना योजना, (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४० %) (कार्यक्रम) (२२११ १३८८), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतूदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

५. सदर खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदर निधी हा सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा. प्रधानमंत्री मातृ वंदना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता संबंधित कार्यालयाने घ्यावी.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.७.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००४१७०२११४८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2019.10.11 16:08:47 +05'30'

**(ज.स.तडवी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल ,(अनुज्ञेयता लेखा व)/लेखापरीक्षा) २/१- महाराष्ट्र ,मुंबई/ नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे
७. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
९. वित्त विभाग व्यय -१३ / अर्थसंकल्प -९, मंत्रालय, मुंबई.
१०. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प / लेखा), मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती (कु.क.)